दुग्धव्यवसाय विकास विभागांतर्गत प्रशासकीय विभाग खरेदी समिती गठीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः दुविआ-१३२२/प्र.क्र.३७/पदुम-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १७ऑगस्ट, २०२३

**वाचा:** १. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भागIII/उद्योग-४,दि.३०.१०.२०१५
२.शासन निर्णय क्र.दुविआ-१४१६/प्र.क्र.२२/पदुम-९,दि.६.४.२०१६
३. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भागIII/उद्योग-४दि.१.१२.२०१६
४. शासन निर्णय क्र.दुविआ-१३२२/प्र.क्र.३७/पदुम-९,दि.११.४.२०२२
५. शासन निर्णय क्र - विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ (वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उपविभाग१ते ५)

**प्रस्तावना:-**

आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांचे अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या शासकीय दूध योजना, बृहन्मुंबई दूध योजनेतंर्गत कार्यरत दुग्धशाळा व कार्यालय यासाठी वेगवेगळ्या साहित्याची खरेदी करण्यासाठी संदर्भ क्र.२ दिनांक १.१२.२०१६ येथील शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या बाबींना अनुसरून संदर्भ क्र.४ दि.११.४.२०२२ अन्वये प्रशासकीय विभाग खरेदी समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णय उपरोक्त वाचा येथील संदर्भ क्र.२ दि.६.४.२०१६ अधिक्रमित करून निर्गमित केला आहे. तथापि, संदर्भ क्र.४, दि.११.४.२०२२ शासन निर्णयानुसार आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचे अधिपत्याखालील दुग्धशाळा व कार्यालयांसाठी करण्यात येणाऱ्या खरेदीसंबंधची सर्व प्रकरणे शासन स्तरावर सादर करण्यात येतात. तसेच निविदेच्या मसुद्यास मान्यता, तांत्रिक व आर्थिक लिफाफा उघडणे या बाबीही राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीसमोर सादर करण्यात येतात. तथापि, सदर बाबींवर प्रशासनिक विभाग प्रमुख/ विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख/जिल्हास्तरीय प्रमुख यांना संदर्भ क्र.५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार प्रकरणपरत्वे कार्यवाही होणे आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेता,संदर्भ क्र.२ व ४ येथील शासन निर्णय अधिक्रमित करून सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

**१.** आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांचे अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या शासकीय दूध योजना, बृहन्मुंबई दूध योजनेतंर्गत कार्यरत दुग्धशाळा व कार्यालय यासाठी वेगवेगळ्या साहित्याची खरेदी तसेच विविध योजनेतंर्गतची यंत्रसामुग्रीची खरेदी/वाहतूक व इतर सेवा उपलब्ध करण्याबाबतची प्रकरणे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच तसेच सदर वित्तीय अधिकार नियमात वेळावेळी करण्यात आलेल्या/येणाऱ्या सुधारणा विचारात घेऊन, प्रशासनिक विभाग प्रमुख/ विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख/जिल्हास्तरीय प्रमुखास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार खालील “अ”, “ब”, “क” व “ड” येथील खरेदी समितीसमोर सादर करण्यात यावीत.

## २. अ) राज्यस्तरीय प्रशासकीय खरेदी समितीची संरचना

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (पदु), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | सह/उप सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई | सदस्‍ा |
| ३. | उप आयुक्त, (अभियांत्रिकी), आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचे कार्यालय. | सदस्य |
| ४. | सहायक आयुक्त, अंतर्गत लेखापरीक्षा, आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचे कार्यालय. | सदस्य |
| ५. | उद्योग सहसंचालक (भा.ख.)/उद्योग संचालनालयाचा प्रतिनिधी. | निमंत्रित सदस्य |
| ६. | सह/उप सचिव (दुग्ध), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

## ब) विभाग स्तरीय खरेदी समिती संरचना

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २. | महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दुध योजना, मुंबई | सदस्य |
| ३. | उप आयुक्त, (अभियांत्रिकी), आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचे कार्यालय | सदस्य |
| ४. | सहायक आयुक्त, अंतर्गत लेखापरीक्षा, आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचे कार्यालय | सदस्य |
| ५. | उद्योग उपसंचालक (भा.ख.)/उद्योग संचालनालयाचा प्रतिनिधी | निमंत्रित सदस्य |
| ६. | उप आयुक्त, प्रक्रिया व वितरण, आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचे कार्यालय | सदस्य सचिव |

## क) प्रादेशिक स्तरीय खरेदी समिती संरचना

| | | |
|---|---|---|
| १ | संबंधित प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी | अध्यक्ष |
| २. | दुग्धशाळा अभियंता, प्रा. दु. वि. अ. यांचे कार्यालय. | सदस्य |
| ३ | लेखा अधिकारी (लेखा व कोषागारे विभागीय कार्यालय)/प्रतिनिधी | सदस्य |
| ४. | तांत्रिक तज्ञ (आवश्यक असल्यास) | सदस्य |
| ५. | उद्योग सहसंचालक (विभागीय कार्यालय)/प्रतिनिधी | निमंत्रित सदस्य |
| ६. | खरेदीदार विभागाचे /कार्यासनाचे खरेदी प्रक्रिया हाताळणारे अधिकारी | सदस्य सचिव |

## ड) जिल्हास्तरीय खरेदी समिती संरचना

| | | |
|---|---|---|
| १. | संबंधित जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी | अध्यक्ष |
| २. | लेखा अधिकारी,(लेखा व कोषागारे विभाग)/प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | तांत्रिक तज्ञ (आवश्यक असल्यास) | सदस्य |
| ४. | संबंधित जिल्ह्याचे उद्योग विभागाचा प्रतिनिधी | सदस्य |
| ५. | दुग्धशाळा व्यवस्थापक | सदस्य सचिव |

३. दुग्धव्यवसाय विभागाच्या संदर्भात केंद्रपुरस्कृत/राज्यपुरस्कृत योजना तसेच जिल्हा योजनेतंर्गत उपलब्ध निधीतून तसेच इतर शासकीय निधीतून खरेदी करावयाचे संपूर्ण यंत्रसामुग्री/साहित्यांची खरेदीची प्रकरणे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच तसेच सदर वित्तीय अधिकार नियमात वेळावेळी करण्यात आलेल्या/येणाऱ्या सुधारणा विचारात घेऊन प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार उपरोक्त अ", "ब", "क" व "ड" येथील खरेदी समितीसमोर सादर करण्यात यावीत.

४. केंद्रपुरस्कृत/राज्यपुरस्कृत योजनांसाठी उपलब्ध निधीतून खरेदी करावयाच्या यंत्रसामुग्रीबाबत जर संबंधित योजनेकरीता निर्गमित करण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयात खरेदी प्रक्रिया क्षेत्रीय स्तरावरच राबविण्याबाबत सुचना असतील तर त्याप्रमाणे क्षेत्रीय स्तरावरच कार्यवाही करावी. सदर प्रकरणे शासन स्तरावर सादर करण्यात येऊ नयेत.

५. उपरोक्त वाचा क्र.३ येथील दि.१.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठी कार्यपध्दतीच्या सुधारीत नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.२.९.२ येथे नमूद केल्यानुसार निविदा सुचना तयार करणे, तपशिलवार वैशिष्ट्यांना अंतिम स्वरूप देणे, तांत्रिक व आर्थिक लिफाफा उघडणे व छाननी करणे या प्रक्रिया वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच तसेच सदर वित्तीय अधिकार नियमात वेळावेळी करण्यात आलेल्या/येणाऱ्या सुधारणा विचारात घेऊन प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार उपरोक्त अ", "ब", "क" व "ड" येथील खरेदी समितीसमोर सादर करण्यात यावीत.

६. दुग्धव्यवसाय विभागाच्या नियंत्रणाखाली कार्यरत असलेल्या शासकीय दूध योजना तसेच बृन्हमुंबई दूध योजनेतंर्गत कार्यरत असलेल्या दुग्धशाळा व कार्यालये तसेच केंद्र/राज्य/जिल्हास्तरीय विविध योजनेतंर्गत वेगवेगळे साहित्य/यंत्रसामुग्री/सेवा व आवश्यक असलेल्या सर्व बाबींच्या खरेदी प्रक्रियेसंदर्भात प्रकरणपरत्वे उपरोक्त "अ","ब", "क" व "ड"येथील समितीने कार्यवाही करावी.

७. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या वाचा क्र.३ येथील दि.१.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठी कार्यपध्दतीच्या सुधारीत नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.२.९.२ येथे नमूद केल्यानुसार दुग्धव्यवसाय विकास विभागास खरेदी करावयाचे साहित्य/यंत्रसामुग्रीबाबत निष्पक्षपातीपणे तांत्रिक विनिर्देश (Technical Specifications) ठरविण्यासाठी आणि राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीस तांत्रिक सहकार्य करण्यासाठी दुग्धव्यवसाय विकास विभागातंर्गत खालीलप्रमाणे तांत्रिक विनिर्देश समिती गठीत करण्यात येत आहे.

- **तांत्रिक विनिर्देश समिती संरचना**

| | | |
|---|---|---|
| १. | आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुबई | अध्यक्ष |
| २. | महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दुध योजना, मुंबई | सदस्य |
| ३. | उप आयुक्त (अभियांत्रिकी), दुग्धव्यवसाय विकास विभाग, मुंबई | सदस्य |
| ४. | तांत्रिक तज्ञ (आवश्यक असल्यास) | निमंत्रित सदस्य |
| ५. | उप आयुक्त (प्रक्रिया व वितरण),दुग्धव्यवसाय विकास विभाग, मुंबई | सदस्य सचिव |

**८. तांत्रिक विनिर्देश समितीची कार्ये:**

१. दुग्धव्यवसाय विभागातंर्गत खरेदी करण्यात येणारे साहित्य/यंत्रसामुग्री यांची उपयुक्तता तपासून त्यांचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specifications) निश्चित करणे.

२. दुग्धव्यवसाय विभागातंर्गत खरेदी करण्यात येणारे साहित्य/यंत्रसामुग्रीचे घटक भाग यांच्या गुणवत्तेची माहिती घेऊन अशी यंत्रसामुग्री/साहित्य इ. खरेदीसाठी निवड करणे.

**९. सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना:-**

१. खरेदी प्रक्रिया राबवितांना उपरोक्त वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठी कार्यपध्दतीच्या सुधारीत नियमपुस्तिकेतील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२. वरील सर्व समित्यांनी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच तसेच सदर वित्तीय अधिकार नियमात वेळावेळी करण्यात आलेल्या/येणाऱ्या सुधारणा विचारात घेऊन प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत खरेदी प्रक्रिया राबवावी. तसेच खरेदी प्रक्रिया राबवितांना वित्तीय नियमांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. खरेदी समितीने संबंधित आर्थिक वर्षात विविध योजनेतंर्गत उपलब्ध आर्थिक जिल्हा/राज्य/केंद्र पुरस्कृत व इतर अर्थसंकल्पित निधी विचारात घेऊन त्यासाठी त्याप्रमाणात खरेदी प्रक्रिया राबविणे आवश्यक अाहे.

४. सदर शासन निर्णय हा आयुक्त, दुग्धव्यवसाय यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व शासकीय दूध योजना, कार्यालये, आरे दुग्ध वसाहत, दापचरी दुग्ध प्रकल्प यांना लागू राहील.

५. सदर शासन निर्णयाबाबत आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व कार्यालयांना अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८१७१६४९३२१२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2023.08.17 16:51:02 +05'30'

**(अश्विनी यमगर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२.मा.उप मुख्यमंत्री महोदय यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई
३.मा.मंत्री (दुग्धव्यवसाय) यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय, मुंबई.
४.सचिव (पदु), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५.आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६.महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दूध योजना, मुंबई
७. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
८. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
९.निवडनस्ती.